अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “उपसंचालक, गट-अ” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-११२१/प्र.क्र.६१/का.१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ सप्टेंबर, २०२१

## शासन आदेश:-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४ (४) (दोन) मधील तरतुदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “उपसंचालक, गट-अ” (S-२०: ५६,१००-१,७७,५००) या संवर्गातील खाली नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्री.अ.द.गोतमारे,<br>जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास),<br>जिल्हा मानव विकास समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली | उपसंचालक,<br>विभागीय आयुक्त कार्यालय,<br>(नक्षलग्रस्त भाग विशेष कृती आराखडा कक्ष),<br>नागपूर |

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (Dies Non) म्हणून गणला जाईल.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ च्या तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. नियोजन विभागाचे या शासन आदेशान्वये श्री.अ.द.गोतमारे, उपसंचालक (गट-अ) यांची बदली त्यांची विनंती विचारात घेऊन करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही. तसेच या शासन आदेशान्वये दिनांक ३०/०९/२०२१ (म.नं.) पासून कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री.अ.द.गोतमारे, उपसंचालक (गट-अ) यांनी पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत सह सचिव, नियोजन विभागाला deepak.desai@nic.inया ई-मेल पत्त्यावर तसेच संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना कळवावा.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून; त्याचा संकेताक २०२१०९२४१२५९४६९९१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak
Shivajirao Desai

Digitally signed by Deepak Shivajirao Desai
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, serialNumber=f3a85577333780db2d347fab235605a8c51e9cf8dc3339f64aba61827c8c000d, cn=Deepak Shivajirao Desai
Date: 2021.09.24 15:19:03 +05'30'

**( दि. शि. देसाई )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
६. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
७. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर
८. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद
९. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली/ नागपूर
१०. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
११. सह सचिव/ उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
१३. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
१४. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, गडचिरोली/ नागपूर
१६. श्री.अ.द.गोतमारे, जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली
१७. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवड नस्ती.